**अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील “अपर संचालक, गट -अ” संवर्गाची दिनांक ०१/०१/२०२१ (दिनांक ०१/०१/२०२० ते दिनांक ३१/१२/२०२०) रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिध्द करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक: ज्येष्ठसू-१०२३/प्र.क्र.६४ /का.१४२७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : - २३ ऑगस्ट, २०२३

**संदर्भ:-** १) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही - २०१६/प्र.क्र.२८१/बारा, दिनांक २१/०६/२०२१.

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/का.१२, दिनांक १३/०७/२०२१.

३) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक ज्येष्ठसू-११२२/प्र.क्र.८४/१४२७, दिनांक ०३/१०/२०२२.

४) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक ज्येष्ठसू- १०२३/प्र.क्र.६२/का.१४२७, दिनांक: २१/०८/२०२३

**शासन परिपत्रक:-**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील “अपर संचालक, गट -अ” संवर्गातील अधिकाऱ्यांची दिनांक १/०१/२०२० रोजीची (दिनांक ०१/०१/२०१९ ते दिनांक ३१/१२/२०१९ या कालावधीची) अंतिम ज्येष्ठतासूची उपरोक्त संदर्भ क्र. ४ अन्वये प्रसिध्द करण्यात आली आहे. तसेच सदर संवर्गाची दिनांक ०१/०१/२०२१ रोजीची (दिनांक ०१/०१/२०२० ते दिनांक ३१/१२/२०२० या कालावधीची) तात्पुरती ज्येष्ठता सूची संदर्भाधीन क्रमांक ३ येथील परिपत्रकाव्दारे प्रसिध्द करण्यात आली आहे. सदर तात्पुरत्या ज्येष्ठतासूची संदर्भात शासनास कोणतेही आक्षेप प्राप्त झालेले नाहीत. त्यानुषंगाने “अपर संचालक, गट -अ” संवर्गातील कार्यरत अधिकाऱ्यांची दिनांक ०१/०१/२०२१ रोजीची (दिनांक ०१/०१/२०२० ते दिनांक ३१/१२/२०२० या कालावधीची) अंतिम ज्येष्ठतासूची या परिपत्रकासोबत जोडलेल्या “परिशिष्ट - अ” नुसार प्रसिध्द करण्यात येत आहे. सदर ज्येष्ठतासूची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता मिळण्याच्या अधिन राहून प्रसिध्द करण्यात येत आहे.

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णया विरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ दाखल केली आहे. सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या पत्र क्रमांक: बीसीसी-२०१७/प्र.क्र.३१२A/१६-ब, दिनांक २९/१२/२०१७ च्या पत्रान्वये विधी व न्याय विभागाच्या सहमतीने पदोन्तीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत अशा सूचना निर्गमित केलेल्या आहेत. सदर सूचना विचारात घेऊन “अपर संचालक, गट-अ” संवर्गातील पदोन्नती कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात “अपर संचालक, गट-अ”

पदावर पदोन्नती देण्यात आलेली आहे. त्यामुळे मा.सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयानंतर "अपर संचालक, गट-अ" यांच्या सदर ज्येष्ठतासूचीत सुधारण होऊ शकते.

३. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांनी हे परिपत्रक व सोबतची अंतिम ज्येष्ठतासूचीची प्रत संकेतस्थळावरुन प्राप्त करुन घेऊन "अपर संचालक, गट-अ" संवर्गातील संबंधित अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणावी व तसे कळविल्याबाबत संबंधित अधिकाऱ्यांची स्वाक्षरी घेतलेली प्रत अभिलेख्यावर ठेवावी.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन परिपत्रक उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०२३०८२३१४४७०५९५१६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRAKASH BABANRAO GHADGE

Digitally signed by PRAKASH BABANRAO GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2f90259e87b0960801edc01f52214ff1b58c7e3c653fb93bef856fb92941b9d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=77E1EBA3AEC9A0675410DB6FA1A645387767189322F02B94733DEF91397C59A0, cn=PRAKASH BABANRAO GHADGE
Date: 2023.08.23 14:49:29 +05'30'

**(प्र.ब.घाडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत:- परिशिष्ट- "अ"**

**प्रत :-**

(१) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
- यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक त्यासोबतच्या परिशिष्ट-अ सह अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करावे.

(२) निवडनस्ती

**नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.ज्येष्ठसू-१०२३/प्र.क्र.६४/का.१४२७, दिनांक २३/०८/२०२३ सोबतचे परिशिष्ट-अ अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या अपर संचालक, गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांची दिनांक १/१/२०२१ (दिनांक १/१/२०२० ते दिनांक ३१/१२/२०२०) रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची**

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्याचे नांव | जातीचा प्रवर्ग | सेवा प्रवेशाचा प्रकार | जन्मदिनांक | संवर्गातील सेवेच्या प्रारंभाचा दिनांक | ज्येष्ठता निश्चित करण्यासाठी स्थानापन्नता सुरू झाल्याचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| **खंड दिनांक १/१/२०१७ ते दिनांक ३१/१२/२०१७** | | | | | | | | | |
| १ | १ | श्री.वि.कृ. आहेर | अजा | प | ०९-०३-६६ | २०-०३-१७ | २०-०३-१७ | ३१-०३-२४ | |
| **खंड दिनांक १/१/२०१९ ते दिनांक ३१/१२/२०१९** | | | | | | | | | |
| २ | २ | श्री. चं. ब. औरंगाबादकर | | प | ०६-०४-६२ | ३१-०८-१९ | ३१-०८-१९ | ३०-०४-२० | सेनि ३०/४/२०२० |
| **खंड दिनांक १/१/२०२० ते दिनांक ३१/१२/२०२०** | | | | | | | | | |
| ३ | ३ | श्री. ज. रा. सरनाईक | | प | ०६-०४-६२ | २३-०४-२० | २३-०४-२० | ३०-०४-२० | सेनि ३०/४/२०२० |
| ४ | ४ | श्री.वा.ब. काळे | इमाव | प | ०२-१०-६४ | २४-०८-२० | २४-०८-२० | ३१-१०-२२ | |
| ५ | ५ | श्री.जि.व. चौधरी | | प | ०१-०७-६६ | २४-०८-२० | २४-०८-२० | ३०-०६-२४ | |